**बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील भांडवली कामांच्या खर्चाचा वित्तप्रबंध करण्याकरिता अंतर्गत निधीतून कर्ज उभारणी करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-बीएमसी-२५२५/प्र.क्र.६२/नवि-२१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२५.

**संदर्भ:-** १. मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८
२. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांचे क्र.एमजीसी/एफ/५१३८, दि.३१.१२.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अपेक्षित असलेला रु.२६८८०.५६ कोटींचा भांडवली खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्प 'अ' ला कमी पडणाऱ्या रु.१६८५३.५८ कोटी रकमेच्या तरतुदीची सोय अंतर्गत कर्ज उभारणीद्वारे करणे आवश्यक असल्याने सन २०२४- २५ या वित्तीय वर्षात अर्थसंकल्प 'अ' च्या भांडवली खर्चाची पूर्तता करण्यासाठी रु.१६९०० कोटी अंतर्गत कर्ज २० वर्षासाठी प्रतिवर्षी ९.००% दराने उभारण्यासाठी मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम १०६ अ अन्वये राज्य शासनाची पुर्व मंजूरी देण्याची संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये विनंती केली आहे.

०२. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी दिलेल्या विश्लेषणात्मक माहितीच्या आधारे महानगरपालिकेस असलेली वित्तिय गरज स्पष्ट होते. त्यानुसार बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील भांडवली कामांच्या खर्चाचा वित्तप्रबंध करण्याकरिता अंतर्गत निधीतून कर्ज उभारणी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अपेक्षित असलेला रु.२६८८०.५६ कोटींचा भांडवली खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्प 'अ' ला कमी पडणाऱ्या रु.१६८५३.५८ कोटी रकमेच्या तरतुदीची सोय अंतर्गत कर्ज उभारणीद्वारे करणे आवश्यक असल्याने सन २०२४- २५ या वित्तीय वर्षात

अर्थसंकल्प 'अ' च्या भांडवली खर्चाची पूर्तता करण्यासाठी विकास निधी डिसीआर ६४ (बी) (विशेष निधी), मालमत्ता पुनर्स्थापना व पुनर्वसन निधी (अर्थसंकल्प-ग), घसारा निधी (अर्थसंकल्प-ग) व वृक्ष प्राधिकरण निधी या महानगरपालिकेच्या निधी मध्ये उपलब्ध असलेल्या रक्कमेतून रु.१६९०० कोटी इतके अंतर्गत कर्ज २० वर्षासाठी प्रतिवर्षी ९.००% दराने उभारणीस मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ मधील कलम १०६ अ अन्वये राज्य शासनाची पुर्व मान्यता देण्यात येत आहे.

सदर कर्ज उभारणीच्या प्रस्तावास प्रशासक (स्थायी समिती)/प्रशासक (महानगरपालिका) ठरावाद्वारे मान्यता घ्यावी.

०२. कर्ज उभारणीच्या मर्यादेची सुधारित परीगणना बृहन्मुंबई महानगरपालिकेद्वारे तातडीने करण्यात यावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२८१८४८५२७१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2025.03.28 18:49:41 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
**शासनाच्या सह सचिव**

**प्रत: आवश्यक त्या तातडीच्या कार्यवाहीसाठी**
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव. राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. सभापती, विधान परिषद/ मा. अध्यक्ष, विधानसभा,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा.
५. मा. सर्व विधानसभा आणि विधान परिषद सदस्य
६. मा. मुख्य सचिवांचे सह सचिव.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र -२ नागपूर.
९. मा. महाअधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती(कार्या-नवि-२१)